वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत नांदेड जिल्ह्यातील कामांवरील स्थगिती उठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२१/प्र.क्र.८९/योजना-१**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२४.

वाचा:- १) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२१/प्र.क्र.८९/ योजना-१, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२१/प्र.क्र.८९/ योजना-१, दिनांक २८ एप्रिल, २०२२.
३) शासन पत्र, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक तांसुयो-२०२२/प्र.क्र.९५/योजना-१, दिनांक १८ जुलै, २०२२.
४) शासन पत्र, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक तांसुयो-२०२२/प्र.क्र.९५/योजना-१, दिनांक १० ऑगस्ट, २०२२.

**शासन निर्णय** :-

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत नांदेड जिल्ह्यातील विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या तांडा/वस्तीला अत्यावश्यक पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ०३.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये १०२ कामांना प्रशासकीय मान्यता व सदरहू कामांसाठी रु.८२१.०० लक्ष इतका पुर्ण निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त नमूद १०२ कामांपैकी रु.२००.०० लक्ष रक्कमेची २५ कामे रद्द करुन तितक्याच रक्कमेच्या नवीन ३७ कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि, संदर्भ क्रमांक ३ व ४ येथील शासन पत्रान्वये, सदरहू योजनेंतर्गत हाती घेतलेल्या परंतु, निविदा काढण्यात न आलेल्या, कार्यादेश न झालेल्या तसेच कार्यादेश होऊनही सुरु न झालेल्या कामांना स्थगिती देण्यात आली आहे. आता, वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या नांदेड जिल्ह्यातील रु.२००.०० लक्ष रक्कमेच्या ३७ कामांपैकी सदरहू शासन निर्णयातील अ.क्र.१३ ते २० येथे नमूद ग्रामपंचायत तडखेल, ता.देगलुर येथील रु.३६.०० लक्ष रक्कमेच्या ८ कामांवरील स्थगिती उठविण्यात येत आहे.

२. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांनी सदरहू ८ कामांसाठी संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २८.०४.२०२२ मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे रु.३६.०० लक्ष इतका निधी उपलब्ध

करुन द्यावा. तसेच सदरहू निधी उपलब्ध करुन देण्यापुर्वी संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याची खातरजमा करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०५१४३७३७३०३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.08.05 14:52:00 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, नांदेड.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
७. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक), लातूर.
८. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड.
९. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, नांदेड.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
११. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (योजना-१).